**अखिल भारतीय तंत्र शिक्षण, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यता अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून फार्म डी. अभ्यासक्रमास शासनाची मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्र. टीईएम-२०१८/प्र.क्र.२९२/तांशि-४,**

मंत्रालय विस्तार भवन,मादाम कामा मार्ग ,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक : १० ऑगस्ट,२०१८.

संदर्भ : १) सदस्य सचिव, अखिल भारतीय तंत्र शिक्षण , नवी दिल्ली यांचे पत्र क्र.western/१-३५०८६७००७८/२०१८/EOA/Corrigendum-२, दिनांक १.८.२०१८

२) सदस्य सचिव, अखिल भारतीय तंत्र शिक्षण , नवी दिल्ली यांचे पत्र क्र.western/१-३५०८२०७८४०/२०१८/EOA/Corrigendum-२, दिनांक १.८.२०१८

३) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्र. २/एनजीसी/फार्म डी./२०१८/ १०६१, दिनांक ६.८.२०१८.

**प्रस्तावना :**

अखिल भारतीय तंत्र शिक्षण, नवी दिल्ली यांनी त्यांच्या उपरोक्त संदर्भ १) येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संचालक, तंत्र शिक्षण यांनी त्यांच्या संदर्भ २) येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे, शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून अभिनव एज्युकेशन सोसायटीचे कॉलेज ऑफ फार्मसी (बी.फार्म), पुणे व प्रोग्रसिव्ह एज्युकेशन सोसायटीचे मॉडर्न कॉलेज ऑफ फार्मसी, निगडी, पुणे या संस्थांमध्ये खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे फार्म डी. अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून अभिनव एज्युकेशन सोसायटीचे कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे व प्रोग्रसिव्ह एज्युकेशन सोसायटीचे मॉडर्न कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे या सस्थांना खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नांव | अभ्यासक्रम | प्रवेश क्षमता | संलग्नीत विद्यापीठ |
|---|---|---|---|---|
| १. | अभिनव एज्युकेशन सोसायटीचे कॉलेज ऑफ फार्मसी (बी.फार्म), पुणे | फार्म डी | ३० | डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ,लोणेरे |
| २. | प्रोग्रसिव्ह एज्युकेशन सोसायटीचे मॉडर्न कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे | फार्म डी | ३० | सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे |

**अटी व शर्ती :-**

१. सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२. प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या कॉन्सिल ऑफ इंडिया यांनी विहित केलेल्या फार्मसी तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेशक्षमता वर नमूद केल्याप्रमाणे राहील.

३. शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४. सदर अभ्यासक्रमांच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५. संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६. सदर पदविका, पदवी व पदव्युत्तर पदविका अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमांच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

७. शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिटयूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८. संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

११. याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

**१२. शैक्षणिक वर्ष २०१८-१९ करीताच्या केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेच्या (CAP) ३ फेऱ्या पूर्ण झाल्यानंतर संस्थेचा प्रस्ताव प्राप्त झाल्याने शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मधील प्रवेश हे संस्था स्तरावर विहीत नियमानुसार अंतिम तारीख १४.०८.२०१८ पर्यंत सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे यांच्या पर्यवेक्षणाखाली करण्यात येतील. तसेच सदर संस्थेतील शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मधील या जागांसाठी संस्था स्तरावर प्रवेशित विद्यार्थ्यांना राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती, डॉ.पंजाबराव देशमुख वसतिगृह निर्वाह भत्ता व इतर शिष्यवृत्ती योजनांचा लाभ देय होणार नाही.**

१३. ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०८१०१७१७५४५४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.08.13 15:15:44 +05'30'

**( संजय धारुरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, पुणे.
३) कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे
४) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, जि.रायगड
५) प्राचार्य, अभिनव एज्युकेशन सोसायटीचे कॉलेज ऑफ फार्मसी (बी.फार्म), पुणे
६) प्राचार्य, प्रोग्रसिव्ह एज्युकेशन सोसायटीचे मॉडर्न कॉलेज ऑफ फार्मसी, पुणे
७) अतिरिक्त सचिव (तांत्रिक), भारत सरकार, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक भवन, जनपथ, नवी दिल्ली - ११०००१.
८) सचिव, फार्मसी कौंसिल ऑफ इंडिया, नवी दिल्ली
९) सहाय्यक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्य बळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.
१०) विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डिंग, दुसरा मजला, चर्चगेट, मुंबई.
११) निवडनस्ती/तांशि-४.